**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना पाणलोट विकास घटक २.० या योजनेच्या अंमलबजावणीकरीता अनुसूचित प्रवर्गासाठी सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधी वितरीत करणेबाबत**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष ४४०२ २८८८)**
**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष ४४०२ २८९७)**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १५ मे , २०२४

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
२) मृद व जलसंधारणा विभागाची नस्ती क्र.संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१५/जल-८

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना पाणलोट विकास घटक २.० या योजनेच्या अंमलबजावणीकरीता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-४, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना एकात्मिक पाणलोट क्षेत्र विकास व्यवस्थापन कार्यक्रम (केंद्र हिस्सा ६०टक्के) (कार्यक्रम) लेखाशिर्ष ४४०२ २८८८, ५३- मोठी बांधकामे खाली रु.२२५०.०० लाख तर (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष ४४०२ २८९७, ५३- मोठी बांधकामे खाली रु.१५००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील परिपत्रकान्वये सन २०२४-२५या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरणाबाबत निर्देश दिले आहेत. त्यानुषंगाने मृद व जलसंधारणा विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ च्या नस्तीवरील प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना पाणलोट विकास घटक २.० या योजनेच्या अंमलबजावणीकरीता अनुसूचित प्रवर्गाच्या प्रदानाकरीता केंद्र हिस्सा मुख्य लेखाशीर्ष ४४०२२८८८ खाली रु.२२५०.०० लाख व राज्य हिस्सा मुख्य लेखाशीर्ष ४४०२२८९७ खाली रु. १५००.०० लाख असा निधी प्रधान सचिव (मृद व जलसंधारण विभाग), मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व मृद व जलसंधारण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ४८८/२४/ व्यय-१४ दि. ७.०५.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५१५१७१३१६७३२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4807C89831881EDE55B0D82CB9991539D1BD33C6F8A64931D9194D5E2CBDCF56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2024.05.15 17:26:03 +05'30'

**( सो.ना बागुल )**
**सह सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (मृद व जलसंधारणा विभाग), मृद व जलसंधारणा विभाग, मंत्रालय, मुंबई
२) संचालक, मृदसंधारणा व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे
३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) मृद व जलसंधारणा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग